सांगली मिरज कुपवाड शहर महानगरपालिकेच्या स्थायी समिती सभेने दिनांक २६/११/२०१३ रोजी पारीत केलेला ठराव क्रं.२१, महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम, १९४९ चे कलम ४५१ (३) अन्वये अंतिमत: विखंडीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक न्यायाप्र-२०१८/प्र.क्र.११/नवि-१९**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ०४ डिसेंबर, २०१८

वाचा :-

१.आयुक्त, सांगली मिरज कुपवाड शहर महानगरपालिका यांचे पत्र क्र. मनपा/आस्थावि/१/१०३/ २०१५-१६, दिनांक ३०/०४/२०१५ व क्र.मनपा/आस्थावि/८०/२०१८-१९, दिनांक २१/०४/२०१८.

२.शासन निर्णय सम क्रमांक दिनांक १४ जून, २०१८.

३.आयुक्त, सांगली मिरज कुपवाड शहर महानगरपालिका यांचे पत्र क्र.मनपा/आस्थावि/७४३/२०१८-१९, दिनांक ०१/०९/२०१८.

प्रस्तावना :

सांगली मिरज कुपवाड शहर महानगरपालिका आस्थापनेवरील श्री. प्रकाश साहेबराव गायकवाड, वरीष्ठ लिपिक यांच्या संदर्भात "श्री. गायकवाड यांना मूळ वेतनश्रेणीवर पदावन्नत करणेचा घेतलेला निर्णय चूकीचा व अन्यायकारक असल्याने तो निर्णय ही सभा रद्द करीत असून, श्री. गायकवाड यांनी स्थायी समितीकडे केलेले अपील मान्य करीत आहे. आयुक्त यांनी दिलेली शास्ती रद्द केल्यामुळे श्री.गायकवाड यांना त्यांचे मूळ पदावर निलबंन करण्याचे अगोदर असलेल्या वेतनाच्या टप्प्यावर पदस्थापीत करण्यास ही सभा मान्यता देत आहे. त्यामुळे श्री. गायकवाड यांना निवृत्ती वेतन, उपदान विषयक सर्व देय असलेले सर्व फायदे फरकासह अदा करण्यास या सभेची मान्यता आहे. तसेच श्री. गायकवाड यांना निलंबन कालावधी हा पुर्णपणे कामावर व्यथीत केलेला कालावधी समजून त्यांना त्या अनुषंगाने देय होणारे सर्व आर्थिक फायदे देण्यास ही सभा मंजूरी देत आहे." असा सांगली मिरज कुपवाड शहर महानगरपालिकेच्या स्थायी समिती सभेने पारीत केलेला दिनांक २६/११/२०१३ रोजीचा ठराव क्र.२१, हा महानगरपालिकेच्या आर्थिक हिताच्या विरोधात असल्याने संदर्भीय दिनांक १४/०६/२०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये निलंबित करण्यात आला आहे.

०२. यासंदर्भात मा. उच्च न्यायालयात दाखल रिट याचिका क्र.१३६४२/२०१७ मध्ये दिनांक १८/०४/२०१८ रोजी मा. उच्च न्यायालयाने "महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम, १९४९ मधील तरतूदीनुसार दिनांक ३०/०४/२०१५ रोजीच्या पत्रान्वये आयुक्त, सांगली मिरज कुपवाड शहर महानगरपालिका यांनी शासनास सादर केलेल्या "स्थायी समिती सभा ठराव क्र.२१, दिनांक २६/११/२०१३" विखंडीत करण्याबाबतच्या प्रस्तावावर शासनाने आठ (८) आठवडयाच्या आत निर्णय घ्यावा." असे आदेश दिलेले आहेत.

०३. सांगली मिरज कुपवाड शहर महानगरपालिकेच्या स्थायी समितीने पारित केलेला उक्त ठराव निलंबित करताना संदर्भीय दिनांक १४/०६/२०१८ रोजीच्या शासन निर्णयात महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम, १९४९ च्या कलम ४५१ (२) मधील तरतूदीनुसार संबंधितांना ३० दिवसाच्या आत अभिवेदन करणे आवश्यक असल्याची बाब नमूद करण्यात आली होती. तथापि, सदर प्रकरणी सांगली मिरज कुपवाड शहर महानगरपालिकेचे अभिवेदन प्राप्त झाले नाही. परंतु, आयुक्त, सांगली मिरज कुपवाड शहर महानगरपालिका यांच्याकडून संदर्भिय क्र.३ येथिल पत्रान्वये अभिवेदन प्राप्त झाले असून त्यांनी स्थायी समितीचा दिनांक २६/११/२०१३ रोजीचा ठराव क्र.२१, विखंडीत करण्याबाबत स्पष्ट अभिप्राय सादर केले आहेत.

०४. आयुक्त, सांगली मिरज कुपवाड शहर महानगरपालिका यांनी प्रस्तुत ठराव विखंडनाच्या अनुषंगाने नमूद केलेली कारणमिमांसा विचारात घेता, महानगरपालिकेच्या स्थायी समितीने समंत केलेला ठराव क्र.२१, दिनांक २६/११/२०१३ हा महानगरपालिकेच्या आर्थिक हिताच्या विरोधात असल्याने सदर ठराव विखंडीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सांगली मिरज कुपवाड शहर महानगरपालिकेच्या स्थायी समितीने दिनांक २६/११/२०१३ रोजी पारीत केलेला ठराव क्र.२१, हा महानगरपालिकेच्या आर्थिक हिताच्या विरोधात असल्याचे स्पष्ट होत असल्याने, आयुक्त, सांगली मिरज कुपवाड शहर महानगरपालिका यांनी त्यांच्या संदर्भीय पत्रांव्दारे प्रस्तावित केल्यानूसार स्थायी समिती ठराव क्र.२१ दिनांक २६/११/२०१३ हा शासनास असलेल्या अधिकारांचा वापर करून, महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम, १९४९ मधील कलम ४५१ (३) अन्वये अंतिमत: विखंडीत करण्यात येत आहे.

०२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८१२०४१४३१२४२३२५ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Kailas Madhukar Badhan

Digitally signed by Kailas Madhukar Badhan
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=22804d8f98c03e9a67ca8eca6a02e7eaab4bcc4a3d59dfce4f1c7189ab74b085, serialNumber=e83c1c73de120837488d76379734db4868992e2b35ba1df8cfea9650fcff780f, cn=Kailas Madhukar Badhan
Date: 2018.12.04 14:35:49 +05'30'

**( कैलास बधान )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मुख्यमंत्री महोदय यांचे अपर मुख्य सचिव,मंत्रालय,मुंबई.
२) मा.राज्यमंत्री (नगरविकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) आयुक्त, सांगली मिरज कुपवाड शहर महानगरपालिका, सांगली.
४) नगर सचिव तथा प्राधिकृत अधिकारी, सांगली मिरज कुपवाड शहर महानगरपालिका, सांगली
५) प्रधान सचिव (नवि-२) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई.
६) निवड नस्ती (नवि-१९).